**महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, अकोला अंतर्गत विविध संवर्गातील व्यपगत झालेल्या ४२ पदांपैकी ३० पदे पुनरुज्जीवित करण्याबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि , पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०१२/प्र.क्र.१४८/६-अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९ सप्टेंबर, २०१५.

वाचा: १) शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०१२/प्र.क्र.१४८/६-अे, दिनांक २९/०२/२००८
२) शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०१२/प्र.क्र.१४८/६-अे, दिनांक ३०/१०/२०१४

**शासन निर्णय** :

महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, अकोला अंतर्गत पदांच्या आढाव्यांती ७९१ पदांच्या आकृतिबंधाबाबत वित्त विभागाच्या मान्यतेने शासन निर्णय दिनांक २९/०२/२००८ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. सदर पदांपैकी एकूण १७७ पदे रिक्त होती, त्यापैकी ७३ पदे निरसित/प्रत्यार्पित करण्यास, उर्वरित १०४ रिक्त पदांपैकी आरक्षणाची एकूण ६२ पदे भरण्यास आणि उर्वरित ४२ खुल्या प्रवर्गातील ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असलेली पदे सामान्य प्रशासन विभागाच्या प्रचलित धोरणानुसार/आदेशानुसार महामंडळाने अनुकंपातत्वावरील उमेदवारांमधून भरण्यास तसेच यापैकी उर्वरित पदांबाबत प्रस्ताव स्वतंत्रपणे सादर करण्यास शासन निर्णय दिनांक ३०/१०/२०१४ रोजी मान्यता देण्यात आलेली आहे.

२. त्यानुसार, महामंडळाने खुल्या संवर्गातील एकूण ४२ रिक्त पदांपैकी ३४ पदे पुनरुज्जिवीत करण्याचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केलेला होता. या प्रस्तावातील लिपिक-टंकलेखक संवर्गातील ३ पदे आणि कनिष्ठ ऑपरेटर या संवर्गातील १ पद अश्या एकूण ४ पदांचे काम बाह्यस्त्रोताव्दारे (outsourcing) करुन घेण्यात येत आहे. याप्रमाणे केवळ ३० पदे पुनरुज्जीवित करावी लागणार आहेत.

वित्त विभागाच्या दिनांक २/६/२०१५ च्या शासन निर्णयान्वये नवीन पदनिर्मितीस बंदी घालण्यात आलेली आहे. तथापि, सिडको इ. सारख्या सक्षम स्वायत्त संस्थांना हे नियम लागू नाहीत. महाराष्ट्र बियाणे महामंडळ नफ्यात चालत असून उपरोक्त ३० पदे पुनरुज्जीवित करुन भरल्यामुळे येणारा आर्थिक भार सोसण्यास महामंडळ सक्षम आहे. याकरीता शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य उपलब्ध करुन द्यावयाचे नाही या अधीन राहून खालीलप्रमाणे खुल्या प्रवर्गातील विविध संवर्गातील ३० पदे पुनरुज्जीवित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| संवर्ग | मंजूर पदे | कार्यरत/ भरलेली पदे | व्यपगत झालेले पद/झालेली पदे | पुनरुज्जीवित पद/पदे |
|---|---|---|---|---|
| महाव्यवस्थापक | ०६ | ०५ | ०१ (महाव्यवस्थापक - गुणवत्ता नियंत्रक) | ०१ |
| उप महाव्यवस्थापक / कंपनी सचिव | ०५ | ०३ | ०२ (महाव्यवस्थापक- विपणन व महाव्यवस्थापक उत्पादन) | ०२ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वरिष्ठ कृषि अभियंता | ०४ | ०३ | ०१ (वरिष्ठ कृषि अभियंता) | ०१ |
| केंद्र अभियंता / व्यवस्थापक (प्रक्रिया सामग्री) | ०९ | ०६ | ०३ (केंद्र अभियंता / व्यवस्थापक (प्रक्रिया सामग्री)) | ०३ |
| सहाय्यक क्षेत्र अधिकारी /उपविभागीय व्यवस्थापक) | १७१ | १३३ (उर्वरित ३८ पदांपैकी १८ पदे आरक्षित असून २० पदे खुल्या प्रवर्गातील आहेत.) | २० (सहाय्यक क्षेत्र अधिकारी / उपविभागीय व्यवस्थापक) | २० |
| कनिष्ठ केंद्र अभियंता | ०६ | ०४ (उर्वरित २ पदांपैकी १ पद आरक्षित व १ पद खुल्या प्रवर्गातील आहे) | ०१ (कनिष्ठ केंद्र अभियंता) | ०१ |
| सहाय्यक / भांडारपाल | २४ | २१ (उर्वरित ३ पदांपैकी १ पद आरक्षित व २ पद खुल्या प्रवर्गातील आहे) | ०२ (सहाय्यक / भांडारपाल) | ०२ |

३. सदर पदे भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाने दिलेल्या सूचनांनुसार नेमलेल्या समितीची मान्यता घेवून आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११६/१५-सा.उ., दिनांक २२/०७/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०९१९१५३६५१७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2015.09.19 15:40:49 +05'30'

**(क.य. वंजारे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन, कृषि नगर, अकोला ४४४ १०४

२) महाव्यवस्थापक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन, कृषि नगर, अकोला ४४४ १०४

३) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

४) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

५) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

६) महालेखापाल-१ व २, (लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई व नागपूर

७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

८) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला,

९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१०) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

११) वित्त विभाग, सार्वजनिक उपक्रम, मंत्रालय, मुंबई

१२) कक्ष अधिकारी/अवर सचिव, १-अे / १७-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,

१३) निवड नस्ती / कार्यासन ६-अे, संग्रहार्थ.